महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा) गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यांमध्ये अंशत: बदल करण्याबाबत शिक्षणाधिकारी व तत्सम

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३१२१ /प्र.क्र.८९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ सप्टेंबर, २०२१.

**वाचा:-** शा.शि.व क्री.वि. शासन आदेश क्र. बदली ३१२१/प्र.क्र.८९/प्रशा-२, दिनांक ३०.०७.२०२१.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने शिक्षणाधिकारी व तत्सम संवर्गातील नियतकालिक बदलीचे आदेश दिनांक ३०.०७.२०२१ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये काही अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन सक्षम प्राधिकारी यांच्या लगतपूर्व वरिष्ठ प्रधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार खालील प्रमाणे सुधारित पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व पदनाम | दि. ३०.०७.२०२१ अन्वये करण्यात आलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. मधुकर किसनराव देशमुख, सहा. संचालक,विभागीय उपसंचालक कार्यालय, औरंगाबाद | शिक्षणाधिकारी (माध्य.), जि.प बीड | शिक्षणाधिकारी (माध्य.), जि.प. औरंगाबाद | विनंती नुसार |
| २ | श्री संजयकुमार राठोड, शिक्षणाधिकारी (प्राथ.), जि.प. सोलापूर | शिक्षणाधिकारी (प्राथ.), जि. प.उस्मानाबाद | शिक्षणाधिकारी (प्राथ.), जि. प.सांगली | विनंती नुसार |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१७१११२३१२२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a8b4d56939f92ca00d0f1036f37e5c0743e0f0aea72b2f23cc46d5945ab37d69, pseudonym=0BFE14F7A1A9C39851527D3E05D62CA529C327D7, serialNumber=8E3FEAC5ACB11AE3D9464A8A336D7067314E8F58B632FCBB7B5B4CF900C4649B, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2021.09.17 11:15:57 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२ सर्व शिक्षण संचालक
३. संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक.
४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती,प्रशा-२